धर्मादाय देणगी /निधी वाटपाच्या नियमात सुधारणा करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र.आरएसी-०९१३/प्रक्र. १५० /विशा-९**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ३१ मार्च, २०१५.

वाचा :- १) शासन निर्णय, गृह विभाग क्र.आरएसी-२५/२०००/सीआर-४१/सेकपी-१, दि.२३.४.२००२.

२) शासन पुरकपत्र, गृह विभाग क्र.आरएसी/०७०९/प्रक्र.२१६/सेकपी-१, दि.१.९.२००९.

**प्रस्तावना:-**

अश्वशर्यतीपासून मिळणारा पैजकर, पणकर आणि करमणूक कराच्या एकूण उत्पन्नातून रु.१,००,००,०००/- (रुपये एक कोटी मात्र) एवढा निधी गृह विभागाकडून धर्मादाय संस्थांना धर्मादाय प्रयोजनासाठी देणगीचे वाटप करण्यासाठी दरवर्षी अर्थसंकल्पीत करण्यात येतो. या निधीचे वाटप करण्यासाठी संदर्भाधिन अ.क्र.१ येथील दि.२३.४.२००२ च्या शासन निर्णयाद्वारे धर्मादाय देणगी/निधी नियम विहित करण्यात आले आहेत. या नियमातील तरतुदीनुसार मा. उपमुख्यमंत्री (गृह) / मा.मंत्री (गृह) हे स्वेच्छा निर्णयानुसार सार्वजनिक किंवा खाजगी संस्था/संघटना व व्यक्ती यांना देणगी / अर्थसहाय्य मंजूर करतात.

सदर नियमात देणगी/अर्थसहाय्य मंजूर करण्यासाठी सुस्पष्ट आणि सविस्तर तरतुदी नसल्याने अनेक अडचणी निर्माण होत होत्या. त्याचप्रमाणे सदर निधीचे महालेखापाल कार्यालयाकडून लेखापरिक्षण करतेवेळी त्यांनी ज्या संस्थांना निधी मंजूर केला जातो त्यांचेकडून उपयोगिता प्रमाणपत्र वेळेत प्राप्त होत नाहीत. ज्या संस्थांकडून उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त होत नाहीत, त्या संस्थांवर कार्यवाही करण्याबाबत नियमात कोणतीही तरतूद करण्यात आलेली नाही असा आक्षेप नोंदविला आहे. या संदर्भात शासनाकडून नियमात तरतूद करण्याची कार्यवाही करण्यात येईल असे महालेखापाल कार्यालयास कळविले आहे.

उपरोक्त सर्व बाबींचा विचार करुन धर्मादाय देणगी/निधी वाटपाच्या नियमात सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रस्तावनामध्ये नमूद केलेल्या बाबी विचारात घेऊन संदर्भाधिन अ. क्र.१ येथील शासन निर्णय व संदर्भ क्र.२ येथील शासन पुरकपत्र या शासन निर्णयाद्वारे अधिक्रमीत करुन धर्मादाय देणगी /अर्थसहाय्य यांचे वाटप करण्यासाठी खालीलप्रमाणे सुधारित नियम विहित करण्यात येत आहेत.

१) या नियमांना “धर्मादाय देणगी/निधी नियम” असे म्हणावे.

२) मा.मंत्री (गृह) हे त्यांच्या स्वेच्छा निर्णयानुसार या निधीतील रक्कमेचा महाराष्ट्र राज्यातील किंवा राज्याबाहेरील सामाजिक, शैक्षणिक, सांस्कृतिक, धर्मादाय किंवा तत्सम सार्वजनिक किंवा निम सार्वजनिक स्वरुपाच्या संस्था किंवा संघटना यांना देणग्या देण्यासाठी किंवा मा. मंत्री (गृह)

यांना योग्य वाटेल अशा महाराष्ट्र राज्यातील किंवा राज्याबाहेरील व्यक्तिगत प्रकरणी किंवा मोठया प्रमाणावरील दु:खदजनक प्रकरणी अर्थसहाय्य देण्यासाठी उपयोग करु शकतील. मात्र, ह्या देणगीचा पुढील संस्थांना मदत देण्याकरिता वापर करता येणार नाही.

**(एक)** निव्वळ धार्मिक किंवा जातीय स्वरुपाच्या संस्था, संघटना किंवा सर्व जातीच्या व पंथाच्या व्यक्तींना, ज्यांच्याकडून लाभ घेता येत नाही, अशा संस्था किंवा संघटना, किंवा

**(दोन)** निव्वळ राजकीय स्वरुपाच्या संस्था, संघटना, किंवा राजकीय संघटनांना राजकीय प्रचारासाठी स्थापन केलेल्या नियंत्रीत केलेल्या किंवा पुरस्कृत केलेल्या संस्था किंवा संघटना

३) धर्मादाय देणगी/ अर्थसहाय्य या साठी अर्ज करताना संस्थेने सादर करावयाची कागदपत्रे ----

**अ)** संस्थेचा/व्यक्तीचा अर्ज

**ब)** संस्था नोंदणी अधिनियम, १८६० व मुंबई सार्वजनिक विश्वस्तव्यवस्था अधिनियम, १९५० प्रमाणे संस्थेचे नोंदणी प्रमाणपत्राची प्रत.

**क)** संस्थेच्या घटनेची (उपविधी) धर्मादाय आयुक्तांकडून प्रमाणीत केलेली प्रत

**ड)** संस्थेच्या मागील तीन वर्षातील लेखा परिक्षणाची प्रत.

**इ)** संस्थेच्या मागील तीन वर्षाच्या आयकर (Income Tax) विवरणपत्राची प्रत

**ई)** संस्थेला शासनाकडून नियमित अनुदान मिळत नसल्याचे प्रतिज्ञापत्र.

४) संस्थेला यापूर्वी शासनाकडून धर्मादाय देणगी मंजूर केली असल्यास त्या निधीचा उपयोग मागणी केलेल्याच प्रयोजनासाठी केला असल्याचे सनदी लेखापाल (Chartered Accountant) यांचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर केल्याशिवाय धर्मादाय देणगीसाठी संस्थेला पुन्हा अर्ज करता येणार नाही.

५) संस्था किंवा संघटना यांना रुपये पाच लक्ष आणि व्यक्तीगत रुपये एक लक्ष एवढी कमाल रक्कम धर्मादाय देणगी / अर्थसहाय्य म्हणून मंजूर करता येईल.

६) ज्या संस्थांना /व्यक्तींना धर्मादाय देणगी/ अर्थसहाय्य मंजूर होईल त्यांनी ते ज्या प्रयोजनार्थ घेतले असेल त्याच प्रयोजनासाठी खर्च केल्याबाबतचे “ सनदी लेखापाल “ (Chartered Accountant) यांनी प्रमाणित केलेले उपयोगिता प्रमाणपत्र निधी प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून सहा महिन्याच्या आत शासनास सादर करणे बंधनकारक राहील.

७) उपयोगिता प्रमाणपत्र Utilization Certificate “ सनदी लेखापाल “ (Chartared Accountant) याच्याशिवाय अन्य लेखापरिक्षकांनी (Certified Auditors) प्रमाणित केलेले असल्यास ते शासनाकडून ग्राह्य धरले जाणार नाही.

८) उपयोगिता प्रमाणपत्र निधी प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून सहा महिन्याच्या आत शासनास सादर केले नाही तर संबंधित संस्थेस दोन महिन्याची नोटीस द्यावी, दोन महिन्याची नोटीस

देऊनही उपयोगिता प्रमाणपत्र संस्थेने सादर न केल्यास अशा संस्थांकडून देणगीची रक्कम १२% एवढया दंडनीय व्याजासहित जिल्हाधिकारी यांचेमार्फत वसूल करण्यात येईल.

९) एकाच संस्थेला/व्यक्तीला वर्षातून दोन वेळा धर्मादाय देणगी मंजूर करता येणार नाही.

१०) एकदा धर्मादाय देणगी मंजूर केल्यानंतर त्याच संस्थेला/व्यक्तीला पुन्हा देणगीसाठी तीन वर्षापर्यंत शासनाकडे अर्ज करता येणार नाही.

११) संस्था/व्यक्ती यांनी धर्मादाय देणगीचे अर्ज संपूर्ण कागदपत्रासह माहे एप्रिल ते फेब्रुवारी या कालावधीत शासनाकडे सादर करावेत.

१२) संस्थेने धनादेश घेतल्याची पावती संस्थेच्या लेटरहेडवर धर्मादाय देणगीच्या मागणीपत्रावर ज्यांनी सही केली असेल त्यांच्या सहीने रेव्हेन्यू तिकीट लावून सादर करावी.

१३) संस्थेला/व्यक्तीला धनादेश देताना संस्थेने/व्यक्तीने सहा महिन्याच्या मुदतीत उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्याबाबत हमी पत्र संस्थेच्या लेटरहेडवर द्यावे.

१४) संस्थेने/व्यक्तीने देणगी मंजूर झालेले धनादेश त्याच आर्थिक वर्षात न नेल्यास देणगीची रक्कम व्यपगत होईल.

१५) मुदतबाह्य धनादेशाची मुदत सबळ कारणाशिवाय वाढवून देण्यात येणार नाही.

१६) ज्या संस्थांना शासनाच्या विविध प्रशासकीय विभागाकडून नियमित अनुदान मंजूर केले जाते त्या संस्थांना धर्मादाय देणगीतून आर्थिक मदत मंजूर करता येणार नाही.

१७) सदर नियमांची अंमलबजावणी दिनांक १ एप्रिल,२०१५ पासून करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३२०१७०४०८९३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prakash Ganpat Deshmukh

Digitally signed by Prakash Ganpat Deshmukh
DN: c=IN, o=GOVT. OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prakash Ganpat Deshmukh
Date: 2015.04.07 16:43:06 +05'30'

**( प्र. ग. देशमुख )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, महाराष्ट्र राज्य
२. मा.मुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
३. मा. राज्यमंत्री (गृह) शहरे/ग्रामिण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
४. अपर मुख्य सचिव, गृह विभाग
५. प्रधान सचिव, (अ.व सु.) गृह विभाग

६. सचिव विशेष, गृह विभाग
७. सर्व जिल्हाधिकारी
८. महालेखापाल, महाराष्ट्र (१), (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०.निवासी लेखा अधिकारी, मुंबई
११.वित्त विभाग, व्यय-८/अर्थ-११, मंत्रालय, मुंबई.
१२.सर्व सह/उप सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१३.निवड नस्ती, विशा-९,